**मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर, या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ मिळणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय - मुवाढ -२०२५/(प्र.क्र.४०/२५)/लाक्षेवि (आस्था)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२,

दिनांक: ०४/०४/२०२५

संदर्भ:-

१. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मसिंआ १०९५/२२४/सिं.व्य.(धो), दि.०५/१२/१९९५.
२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००३(७३/२००३)/लाक्षेवि आस्था, दि.२८/०७/२००४.
३. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मुलेप-२०१६/(प्र.क्र.६५/१६)/लाक्षेवि आस्था, दि.१८/०५/२०१६.
४. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२०२२/प्र.क्र.२८/आ.(पुनर्रचना), दि.०४/०५/२०२२.
५. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मुवाढ-२०२४/(प्र.क्र.१६३/२४)/लाक्षेवि आस्था, दि.०८/१०/२०२४.
६. वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३/०३/२०२५.
७. जलसंपदा विभागाचे शासन पत्र क्र. आढावा-२०२५/प्र.क्र.६/आ (पुनर्रचना), दि.१२/०३/२०२५.
८. मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र जा.क्र. मुलेप/आ-१/२८/सप, दि.०७/०१/२०२५ व जा.क्र. मुलेप/आ-१/२७५/सप, दि.२४/०३/२०२५.

**प्रस्तावना -**

मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०९/२०२४ ते दि.२८/०२/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाने त्यांच्या संदर्भ क्र.८ येथील दि.०७/०१/२०२५ रोजीच्या पत्रान्वये त्यांचे

कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ८३ पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.२८/०२/२०२५ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केलेली आहे.

जलसंपदा विभागाचे संदर्भ क्र.४ येथील क्र.आढावा-२०२२/प्र.क्र.२८/आ (पुनर्रचना), दि.०४ मे, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये गट क-२ पदे (लिपिक-टंकलेखक) व गट ड- १ ( शिपाई) अशी एकूण ३ पदे फिरवाफिरवीने अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन विकास संचालनालय, पुणे या कार्यासनास उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्त्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयास, मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाच्या संदर्भ क्र.८ येथील प्रस्तावास तसेच जलसंपदा विभागाचे संदर्भ क्र.४ येथील दि.०४ मे,२०२२ च्या शासन निर्णयास अनुसरून मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयांतर्गत नियत अस्थायी आस्थापनेवरील ८३ पदांना दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय -</u>**

मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाच्या संदर्भ क्र.८ येथील प्रस्तावातील उपलब्ध माहिती विचारात घेऊन खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील कार्यालयनिहाय आकृतीबंधानुसार मंजूर नियत अस्थायी पदांना संदर्भ क्र.६ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर. | ८३ | निरंक | मागणी क्रमांक आय - ३<br>२७०१- मध्यम पाटबंधारे<br>८० सर्वसाधारण,<br>८०० इतर खर्च<br>(०६) महाराष्ट्र जलसंपदा विकास केंद्र, छत्रपती संभाजीनगर.<br>(०६)(०२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जलसंपदा विकास केंद्र, छत्रपती संभाजीनगर (अनिवार्य)<br>(२७०१ ८८२८)<br>०१, वेतन |

१. मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर कार्यालयांतर्गत आकृतीबंधानुसार ८३ पदे नियत अस्थायी आस्थापनेवरील आहेत. आता या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ८३ मंजूर पदांना ती सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही, तसेच ती पदे सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर झालेल्या ४५२९७ पदांच्या मर्यादेत आहेत, या अटीच्या अधीन राहून दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

३. ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसतील, तसेच पदे व्यपगत झालेली नसतील.

४. मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाच्या संदर्भ क्र.८ येथील प्रस्तावातील उपलब्ध माहितीनुसार पदांची संख्या / पदामधील घट / पदामधील वाढ / सेवानिवृत्ती इ. माहिती अंतिम / अचूक आहे असे गृहित धरून पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच यानुषंगाने शासनास पाठविलेल्या प्रस्तावातील पदांची आकडेवारी ही अचुक असल्याची खातरजमा ही संबंधित क्षेत्रीय कार्यालयाने आपल्यास्तरावर करण्याच्या अटीच्या अधीन राहून तसेच याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची असल्याचे गृहीत धरुन पदांना मूदतवाढ देण्यात येत आहे.

५.	या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत विहित वेळेत सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२५०४०४१८५९२१८६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2025.04.04 19:00:14 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

सहपत्र:- विवरणपत्र - १

**प्रत,**

१. महालेखापाल-१, (लेखा परीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-२, (लेखा परीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपुर.
३. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
४. मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.

त्यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलला शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील.

५. जिल्हा कोषागार कार्यालय, छत्रपती संभाजीनगर.
६. वित्त विभाग,(व्यय-१२)/वित्तिय सुधारणा/विनिमय/अर्थ-१९, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग/आ (प्रशी)/अर्थ-१/२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. लाक्षेवि (आस्था)- कार्यासन /निवडनस्ती.

**विवरणपत्र-१**

**शासन निर्णय, क्र.मुवाढ-२०२५/(प्र.क्र.४०/२५)/लाक्षेवि (आस्था), दि.०४/०४/२०२५ चे सहपत्र.**

**मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील मंजूर नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे**

| अ.क्र. | पदनाम | नियत अस्थायी अस्थापनेवरील मुदतवाढ दिलेली पदे |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता | १ |
| २. | कार्यकारी अभियंता | ७ |
| ३. | उप विभागीय अभियंता/सह श्रेणी १ | १४ |
| ४. | शाखा अभियंता/स.अ.श्रे.-२ | २० |
| ५. | विभागीय लेखापाल | १ |
| ६. | प्रथम लिपिक | १ |
| ७. | वरिष्ठ लिपिक | १ |
| ८. | लिपिक/टंकलेखक | १५* |
| ९. | वाहन चालक | ७ |
| १०. | शिपाई | १४* |
| ११. | चौकीदार | २ |
| | **एकूण** | **८३** |

***नोंद टिप्पणी:**- शासन निर्णय क्र आढावा-२०२२/प्र.क्र.२८/आ (पुनर्रचना), दि.०४ मे, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये गट क - २ पदे ( लिपिक-टंकलेखक) व गट ड- १ (शिपाई ) अशी एकूण ३ पदे फिरवाफिरवीने अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन विकास संचालनालय, पुणे या कार्यासनास उपलब्ध करुन देण्यात आली आहेत.

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2025.04.04 19:00:46 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**